सुधारित प्रशासकीय मान्यता

**नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालयीन इमारतीचे बांधकाम करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय, क्र.सीसीबी ११२४/प्र.क्र.६२/का-१३**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**

**दिनांक : १९ जून , २०२५**

**पहा :-**

१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र. सीसीबी-१११९/प्र.क्र.९७/का-१३, दिनांक ४ फेब्रुवारी, २०२०.

२) मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी(डब्ल्यू) ६०४७/ १९७०(११)/१७६४/४०६५५, दिनांक १३ ऑगस्ट, २०२४.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये , नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालयीन इमारत बांधण्याकरिता रु. १७१.७७ कोटी इतक्या खर्चास मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. तद्नंतर उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ येथील मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या पत्रान्वये नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालयीन इमारतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

**नाशिक येथील नवीन जिल्हा न्यायालयीन इमारत बांधण्याकरिता रू.३१०,०२,६६,०००/- (रुपये तीनशे दहा कोटी दोन लक्ष सहासष्ट हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १. | बांधकामाचा खर्च | १,५९,१९,४३,००० |
| ३. | बायो डायजेस्टर | १,१६,६७,७२७ |

| | | |
|---|---|---|
| ४. | रेन / रुफ वॉटर हार्वेस्टिंग | १०,२४,९८९ |
| ५. | सोलर रुफ टॉप | २९,८५,६६० |
| ६. | अपंगांकरिता सरकता जिना | ५,७९,२५,४७७ |
| ७. | फर्निचर | २८,६०,२२,१६२ |
| ८. | पाणी पुरवठा मल:निस्सारण (बांधकाम खर्चाच्या ५०%) | २,०९,९०,२९९ |
| ९. | अंतर्गत विद्युतीकरण (बांधकाम खर्चाच्या ५%) | ११,३९,१८,८२९ |
| १०. | बाह्य विद्युतीकरण (बांधकाम खर्चाच्या ६%) | ५२,४२,८४८ |
| ११. | अग्निशमन यंत्रणा | ६,१९,२२,५५३ |
| १२. | कंपाउंड वॉल व गेट | ५९,३६,२१९ |
| १३. | अंतर्गत रस्ते | ५९,७१,५०४ |
| १५. | वाहतूक व्यवस्था | १७,७९,०२४ |
| १६. | इतर (सेवरेज, स्ट्रॉमवाटर, बगीचा इ.) | २०,००,००० |
| १७. | सी.सी. ड्रेन व सी.डी. वर्क | ११,४३,३२२ |
| १८. | रेन वॉटर हार्वेस्टिंग करता भूअंतर्गत वॉटर टॅंक | ४९,६९,८६७ |
| १९. | वॉटर मेन स्टोरेज, पंप हाऊस व बोर वेल | ७,१६,७७६ |
| २०. | वातानुकूलित यंत्रणा | ४,५५,३१,०२० |
| २१. | लिफ्ट | ३,०२,८९,९५७ |
| २२. | ए. बी. रुम, एरिया लायटिंग, पंप, जनरेटर | २,०८,९०,२८९ |
| २३. | सी.सी.टी.व्ही. | २,४४,२७,८५८ |
| २४. | स्टोरेज करिता कॉम्पॅक्टर | ३,२४,९९,२७५ |
| २५. | आर्किटक्टरल अथेस्टिक ट्रीटमेंट | ११,७४,७४,७७७ |
| २६. | आकस्मिक खर्च (बांधकाम खर्चाच्या ४%) | ३,६१,२२,१८४ |
| २७. | वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या १२%) | २९,३६,७२,८४८ |
| २८. | वाढीव वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या ६%) | १४,६८,३६,४२४ |
| २९. | भाववाढ (प्रकल्प खर्चाच्या १०%) | १७,६३,६१,७८० |
| | **एकूण** | **३,१०,०२,६६,६८८** |
| | **म्हणजेच एकूण** | **रू. ३१००२.६६ लक्ष** |

२. **ही सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-**

१) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे नमूना अंदाजपत्रक असल्याने या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नाशिक च्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) नियोजित जागा उपभोक्त विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) उपरोक्त सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या अधीन राहून वरील सर्व बाबींचा चालू कामामध्ये समावेश करुन काम लवकरात लवकर पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

७) सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावातील फर्निचर नवीन कामे करीता नव्याने निविदा प्रक्रिया राबवून प्रचलित नियमानुसार मान्यता घेण्यात यावी

८) सदर काम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत पूर्ण करण्यात यावे

९) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

११) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, सीव्हीसी तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

१२) आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पूर्तता करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

१३) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेतील तांत्रिक बाबी निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी त्यावेळेच्या प्रचलित शासन निर्णयानुसार करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी मागणी क्र. जे-४, ४०५९ - सार्वजनिक बांधकामावरील खर्च-०१-कार्यालयीन इमारती, ०५१, बांधकाम (०२) विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतीचे बांधकाम व न्यायालयांना पायाभूत सुविधा पुरविणे, (०२)(०१) विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतींचे बांधकाम व न्यायालयीन इमारतींचे बांधकाम (कार्यक्रम) (४०५९ ३३७७) या लेखाशिर्षाखाली मंजूर नियतव्ययातून २०२५-२६ च्या आर्थिक वर्षात खर्ची टाकण्यात येणार आहे. मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.६७/२०२५/इमा-२, दिनांक ३ एप्रिल, २०२५, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२८१/१४४३/, दिनांक २२ एप्रिल, २०२५ आणि मा.उपमुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील व्यय अग्रक्रम समितीची दिनांक १७ जून, २०२५ रोजी चक्रीय पद्धतीने घेतलेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०६१९१७२०१०१०१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS V GAIKWAD

Digitally signed by VILAS V GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Law and Judiciary Department, 2.5.4.20=64F5AB9E019C90AD5DB684984DF113ED09062245CB9E042BE5B12E5AA482FC17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS V GAIKWAD
Date: 2025.06.19 17:20:51 +05'30'

**(विलास वसंत गायकवाड)**

**विधि सल्लागार -नि- सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
४. मा.प्रबंधक, निरिक्षणे-२, बी (डब्ल्यू) शाखा, मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नाशिक
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक
१०.(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
१२.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३.वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४.नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५.कक्ष अधिकारी, का.११ व १२,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६.निवड नस्ती/संग्रहार्थ, का.१३